महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ
मधील स्त्रीरोग तज्ञ या विशेषज्ञ संवर्गातील
अधिका-यांची नामनिर्देशनाने नेमणूक.
डॉ.सुनिल मारुती सोनावणे.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्र. नामनि- १२११/प्र.क्र. ८१/सेवा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० मे, २०११.

वाचा :- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्रमांक ४८२(७१)/ ५२७८-एसडी/ पंधरा-अ, दि. २४ जानेवारी, २०११.

निर्णय :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस करण्यात आलेले उमेदवार डॉ. सुनिल मारुती सोनावणे यांची महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ मधील " वैद्यकीय अधिकारी (स्त्रीरोग व प्रसूती पश्चात कार्यक्रम)" वेतनश्रेणी रु. १५,६०० - ३९१०० ग्रे.पे.६६००/- या संवर्गात " अनुसूचित जाती" या प्रवर्गासाठी राखीव असलेल्या" अनुशेषाची पदे नामनिर्देशनाच्या वाटयावरील पदावर दोन वर्षाच्या कालावधीकरिता परिविक्षाधीन स्वरुपाची, नामनिर्देशनाने नेमणूक करण्यात येत आहे.

२. डॉ. सुनिल मारुती सोनावणे यांची नेमणूक खालील अटी व शर्तीच्या आधीन राहील :-

अ) डॉ. सोनावणे यांची नेमणूक वैद्यकीय तपासणीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

ब) डॉ. सोनावणे यांची नियुक्ती ही त्यांनी पद स्विकार केल्याच्या तारखेपासून दोन वर्षाच्या कालावधीकरिता परिविक्षाधीन स्वरुपाची राहील. जर या परिविक्षा कालावधीत त्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा त्यांची वर्तणूक अयोग्य आढळल्यास त्यांची सेवा संपुष्टात आणली जाऊ शकेल किंवा त्यांचा परिविक्षाधीन काळ आवश्यक त्या कालावधीसाठी वाढविला जाईल. या वाढविलेल्या काळामध्ये देखील त्यांचे काम समाधानकारक झाले नाही तर त्यांची सेवा कोणत्याही पूर्व सूचनेशिवाय संपुष्टात आणली जाईल.

क) डॉ. सुनिल मारुती सोनावणे यांना एक पत्नी हयात असताना दुसरा विवाह करता येणार नाही.

ड) डॉ. सुनिल मारुती सोनावणे यांना शासन सेवेत कमीत कमी ५ वर्षे राहण्याचे किंवा ते न झ़ ााल्यास रु. ५००/- (अक्षरी रुपये पाचशे फक्त) अगर शासन विहीत करील ती रक्कम दंड म्हणून देण्याचे तसेच इतर सेवा शर्तीच्या पूर्ततेसंबंधीचे बंधपत्र लिहून द्यावे लागेल.

इ) डॉ. सोनावणे यांना शासनाने विहीत केलेल्या हिंदी व मराठी परिक्षा त्यांना उत्तीर्ण व्हाव्या लागतील.

फ़) एक महिन्याची आगाऊ सूचना दिल्याशिवाय अगर एक महिन्याचे वेतन परत केल्याशिवाय डॉ. सुनिल मारुती सोनावणे यांना सेवामुक्त होता येणार नाही.

ग) डॉ. सुनिल मारुती सोनावणे यांनी सदर नियुक्ती स्वीकारल्यानंतर त्यांना स्वत:चे खाजगी रुग्णालय सुरु करता येणार नाही.

४. नामनिर्देशनाने नियुक्तीनंतर डॉ. सुनिल मारुती सोनावणे यांना उपजिल्हा रुग्णालय, फलटण, जिल्हा सातारा येथील "वैद्यकीय अधिक्षक" या रिक्त पदावर तात्पुरता संवर्ग बदलून पुढील आदेश होईपर्यंत पदस्थापना देण्यात येत आहे. डॉ. सोनावणे यांनी त्यांना देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी ३० दिवसाचे आत रुजू व्हावे अन्यथा ते या पदावर नियुक्तीस इच्छूक नाहीत असे समजून त्यांची नियुक्ती रद्द करण्यांत येईल.

५. डॉ. सोनावणे हे महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ मधील पदस्थापनेच्या पदावर रुजू झाल्यानंतर त्यांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील तरतुदीप्रमाणे निश्चित करण्यात यावे.

६. सदरचे आदेश WWW.maharashtra.gov.in वर सांकेतांक क्र.२०११०६०११४०६०४००१ येथे प्रसिध्द करण्यात आले आहेत. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( राजेंद्र पवार )
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव.

प्रति,

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई,
उप संचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, कोल्हापूर.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
डॉ. सुनिल मारुती सोनावणे, वैद्यकीय अधिकारी, सामान्य रुग्णालय, सातारा.
निवड नस्ती (सेवा-२)